ई - साहित्य प्रकाशन
वर्ष : दूसरे, अंक : १२
दिनांक : २२.०३.२०१०

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com

# नेताक्षरी

देणाऱ्याने देत जावे घेणाऱ्याने घेत जावे
घेता घेता एक दिवस देणाऱ्याचे हात घ्यावे



संपादक -
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

सहसंपादक -
सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
सचिन काकडे ( मुंबई )

### ....जामीन....

त्याचे ते अस्ताव्यस्त गहनगाज शब्द
ओळींच्या चिमटीत सापडले नाहीत
म्हणून
कापू नका
रक्त येईल
त्याच्या शब्दांना प्रत्येक अक्षर जामीन आहे

इदं न मम

# संपादकीय

शब्दांची लय,ताल,अर्थाच्या ताकदीची बिनचूक जाण,भावप्रकटीकरणातील प्रयोगशीलता,आयुष्याला सर्वांगाने भिडण्याची असोशी आणि सभोवतालचे भान अशा शिदोरीवर विविध साहित्यप्रांतात स्वच्छंद संचार करणारे ज्ञानपीठ पुरस्कार विजेते ज्येष्ठ साहित्यिक गोविंद विनायक उर्फ विंदा करंदीकर यांचे वयाच्या ९२ व्या वर्षी १४ मार्च २०१० रोजी निधन झाले.

'देणाऱ्याने देत जावे' या आपल्या कवितेतील ओळींना अखेरच्या क्षणी कृतीची जोड देत त्यांनी देहदान केले.आपल्या साहित्यातील शब्द कागदापुरतेच राहणारे नाहीत हे त्यांनी सप्रमाण दाखवून दिले.अशा बहुगुणी कवी असलेल्या गुणी माणसाला शब्दात मांडण्याचा नेटाक्षरीचा हा प्रामाणिक प्रयत्न.

तसे पाहिले तर मनावर दगड ठेवूनच मराठी साहित्यरसिकाला विंदाचे हे जाणे सहन करावे लागणार आहे.विशेष करुन ह्यासाठी की ते पुणे येथे होणाऱ्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे उद्‌घाटन करणार होते,आणि उद्‌घाटनपर भाषण नाही तर काव्यवाचन करणार होते.पण,हे सारे होण्याआधीच ते आपल्यातून निघून गेले.पण,त्यांची कविता अमर करुन..स्वतःही अमर होऊन.कारण त्यांच्या कवितांमधून तर ते आपल्यासमवेतच असणार आहेत ना !

विंदा मराठी साहित्यातील एक पर्व होते.त्यांच्या साहित्याचा पिंड हा महापुराचा प्रवाह होता.ज्याप्रमाणे महापुराचा प्रवाह जसा झोपड्यांना कवेत घेतो तसेच बंगल्यांनाही कवळतो तसेच विंदानीही ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवाचे अर्वाचीन मराठीत रुपांतर केले आणि आधुनिक युगाचा आरसा असलेली 'यंत्रावतार' ही प्रसिध्द कविताही लिहली.लघुनिबंध,बालकविता,अभंग,सुक्ते,मुक्त सुनीते,गझल,विरुपिका असा त्यांचा साहित्याचा आवाका प्रचंड होता.चाकोरीबाह्य विश्वाचा एक कोपरा उघडून दाखविणारे लेखन हा विंदाची खासियत होती.याच विशेषातून त्यांनी ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र लिहले.शेक्सपिअरच्या किंग लिअर चा त्यांनी केलेला अनुवाद तर अनुवादित साहित्यातला मापदंडच आहे.

विंदाची कविता सतत माणसाच्या जगण्याचा आणि सत्याचा शोध घेत राहिली.कविता ही त्यांची भावभूमी होती.म्हणूनच कम्युनिस्ट थाटाच्या कवितांपासून ते जीव ओवाळून टाकावा अशा प्रेमकविताही त्यांनी लिहल्या.लहानांसाठी एटू लोकांचा देश,परी ग परी,सशाचे कान अशा अनेक सुंदर बालकविता लिहणारे विंदा आजोबा तर आणखीन वेगळेच.अशा तरल संवेदनशीलतेमुळेच स्त्रीत्वाचा शोध घेणारी प्रदीर्घ 'संहिता'ही ते लिहू शकले.स्वेदगंगा,मृदगंध,धृपद,जातक,विरुपिका,अष्टदर्शने ह्या काव्यसंग्रहांची अमूल्य भेट त्यांनी मराठी काव्यप्रेमींना दिलीय.

विंदा हे फक्त 'लिहते'च नव्हते तर 'बोलते'ही होते.तरुणपणापासूनच विंदा काव्यवाचन करीत असत.त्यांच्या काव्यवाचनात प्रचंड नाट्यमयता असे.त्यामुळे त्यांचे वाचन सुश्राव्य होई.ते कविता वाचायला लागले की त्यांच्यात काहीतरी संचारायचे,त्यांना वेगळेच बळ यायचे अन त्या कविता ऐकतांना श्रोत्यांना अपार आनंद व्हायचा पण वयाच्या ८५ व्या वर्षीही जेव्हा त्यांनी दिल्लीला ज्ञानपीठ स्वीकारल्यानंतर 'यंत्रावतार' कवितेचे वाचन उपस्थितांसमोर केले तेव्हा मंचावर विराजमान राष्ट्रपती अब्दुल कलाम ह्यांसह समस्त श्रोतेजण थरारुन गेले होते.

विंदा एक महान कवी होते पण त्याहीबरोबर ते माणूसपण जपणारे कवी होते असे म्हणणे जास्त योग्य ठरेल.विंदांनी हैदराबादच्या मुक्तिसंग्रामात भाग घेतला होता.तुरुंगवास भोगला होता.त्या सहभागाबद्दल त्यांना स्वातंत्र्यसैनिकाचे पेन्शन देण्यात आले मात्र त्यांनी ते असे सांगत नाकारले की,नागरिक म्हणून ते त्यांचे कर्तव्यच होते.

१९६७-६८ सालापासून २००६ पर्यंत अनेक मानसन्मान मिळूनही त्यांच्या रकमांच्या राशी त्यांनी दान केल्या.सुमारे ८ ते १० लाखांचे हे पुरस्कार त्यांनी गरीबांसाठी,एचआयव्हीबाधितांच्या उपचारासाठी,संस्थासाठी दान केले.त्यांच्या विचार प्रकृतीची मांडणी सांगणारे आणखी एक उदाहरण म्हणजे,प्राध्यापक म्हणून निवृत्तीस काही वर्षांचा अवकाश असूनही त्यांनी स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली कारण तसे त्यांनी केले नसते तर दोन तरुण ज्युनिअर प्राध्यापकांच्या नोकऱ्या नवीन शैक्षणिक पध्दतीतील नियमानुसार गेल्या असत्या.वास्तविक त्यावेळी विंदांची स्वतःचीही आर्थिक परिस्थिती बेताचीच होती.त्यांनी अपार कष्टाचे आयुष्य काढले पण हे आयुष्य ते इमानाने जगले.अनेकांना त्यांनी हात दिला.कधी आधारासाठी तर कधी आशीर्वादासाठी..

अशा ह्या प्रतिभासंपन्न कवीची आयुष्यभर सावली राहिलेल्या सुमा करंदीकर ह्या विंदांच्या अर्धांगिनीने स्वतःच्या आत्मचरित्रपर लिहलेल्या पुस्तक ‘रास’ मधून विंदाचे एक निराळेच रुप वाचकांसमोर येते.विंदा....भाज्या आणणारे,आवडीने घरात सुतारकाम करणारे,नातवंडांना गायत्रीमंत्र शिकवणारे,घराच्या दुरुस्तीच्या वेळेस भिंतीवर पडलेले हरतऱ्हेचे डाग रंगरंगोटी करुन सुबक करणारे,स्वयंपाकघरात लुडबुड करणारे,घरातली बाजाची चांगली पेटी भिकाऱ्याला देऊन टाकणारे.त्यांची ही सारी रुपं ,मजेदार किस्से वाचता वाचता एका दिलखुलास विंदांची ओळख होते.

विंदांच्या समकालीन कवी,लेखक,साहित्यकारांनी विंदा विषयी,त्यांच्यासमवेतच्या प्रसंगांविषयी भरपूर लिहलेले आहे. .अगदी वसंत बापट ते संदीप खरे ह्यांनी विंदांना शब्दंबध्द केलंय.जितके ते वाचू तितके विंदा एक उत्तम कवी अधिक होते की उत्तम माणूस अधिक होते असा प्रश्न पडल्याशिवाय राहत नाही.

खरं तर ‘मृदगंध’ हा फक्त मनोमन अनुभवावा कारण तो शब्दांतीत असतो.पण , तरीही विंदाच्या अफाट कारकिर्दीचा नेटाक्षरीने घेतलेला हा चिमुकला आढावा......विंदाक्षरी......

**- स्वप्ना कोल्हे , नाशिक**
**( संपादक )**

### ....यमक....

स्वप्नामध्ये रचिल्या ओळी , यमक मला नच सापडले
अर्थ चालला अंबारीतून , शब्दं बिचारे धडपडले
प्रतिमा आल्या उंटावरुनी , नजर तयांची पण वेडी
शब्दं बिथरले त्यांना भ्याले , स्वप्नांची चढण्या माडी
थरथरली भावना मुक्याने , तिला न त्यांनी सावरले
स्वप्नामध्ये रचिल्या ओळी , यमक मला नच सापडले

### ....फक्त एकदा....

फक्त एकदा तुझ्यात यावे
तुझा करावा एकच घोट
तुझ्या गळयाला दंश करावा ,तुझा गिळावा बधीर ओठ
फक्त एकदा आणि करावी
शतजन्मातील एकच चोरी
कुबेर होऊन तुझ्यात यावे , होऊन जावे पुरे भिकारी....

## ....माझ्या मना बन दगड....

माझ्या मना बन दगड,
हा रस्ता अटळ आहे
अन्नाशिवाय,कपड्याशिवाय,ज्ञानाशिवाय,मानाशिवाय
कुडकुडणारे हे जीव पाहू नको ! डोळे शीव
नको पाहू जिणे भकास ऐन रात्री होतील भास
छातीमध्ये अडेल श्वास विसर यांना,दाब कढ
माझ्या मना बन दगड
हा रस्ता अटळ आहे
ऐकू नको हा आक्रोश तुझ्या गळ्याला पडेल शोष
कानांवरती हात धर त्यातूनही येतील स्वर
म्हणून म्हणतो,ओत शिसे संभाळ,संभाळ,लागेल पिसे
रडणाऱ्या,रडशील किती? झुरणाऱ्या,झुरशील किती?
पिचणाऱ्या,पिचशील किती? ऐकू नको असला टाहो
माझ्या मना दगड हो !
हा रस्ता अटळ आहे
येथेच असतात निशाचर जागोजाग रस्त्यावर
असतात नाचत काळोखात हसतात विचकून काळे दात
आणि म्हणतात,कर हिंमत आत्मा विक,उचल किंमत
माणूस मिथ्या,सोने सत्य स्मरा त्याला,स्मरा नित्य
भिशील ऐकून असले वेद बन दगड,नको खेद !
बन दगड आजपासून काय अडेल तुझ्यावाचून
गालावरचे खारे पाणी पिऊन काय जगेल कोणी ?
काय तुझे हे निःश्वास मरणाऱ्यांना देतील श्वास ?
आणिक दुःख छातीफोडे देईल त्यांना सुख थोडे ?
आहे दुःख तेच फार माझ्या मना कर विचार
कर विचार,हस रगड माझ्या मना बन दगड

हा रस्ता अटळ आहे
अटळ आहे घाण सारी
अटळ आहे ही शिसारी
एक वेळ अशी येईल
घाणिचेच खत होईल
अन्यायाची सारी शिते
उठतील पुन्हा,होतील भुते
या सोन्याचे बनतील सूळ
सुळी जाईल सारे कूळ
ऐक टापा ! ऐक आवाज
लाल धूळ उडते आज
याच्यामागून येईल स्वार
या दगडावर लावील धार
इतके यश तुला रगड
माझ्या मना बन दगड



## ....चुकली दिशा तरीही....

चुकली दिशा तरीही हुकले न श्रेय सारे
वेड्या मुशाफिराला सामील सर्व तारे

मी चाललो अखंड चालायचे म्हणून
धुंदीत या गीताच्या सारेच पंथ प्यारे

डरतात वादळांना जे दास त्या ध्रुवाचे
हे शीड तोडले की अनुकूल सर्व वारे

मग्रूर प्राक्तनाचा मी फाडला नकाशा
विझले तिथेच सारे रे मागचे इशारे

चुकली दिशा तरीही आकाश एक आहे
हे जाणतो त्याला वाटेल तेथे न्यारे

आशा तशी निराशा हे श्रेय सावधाचे
बेसावधास कैसे डसणार हे निखारे



# ....तेच ते तेच ते....

तेच ते तेच ते
सकाळपासून रात्रीपर्यंत तेच ते !! तेच ते
माकडछाप दंतमंजन
तोच चहा तेच रंजन
तीच गाणी तेच तराणे
तेच मूर्ख तेच शहाणे
सकाळपासून रात्रीपर्यंत
तेच ते तेच ते
खानावळीही बदलून पाहिल्या
कारण जीभ बदलणं शक्य नव्हतं
काकूपासून ताजमहाल
सगळीकडे सारखेच हाल
नरम मसाला,गरम मसाला
तोच तो भाजीपाला
तीच ती खवट चटणी
तेच ते आंबट सार
सुख थोडे दुःख फार
संसाराच्या वडावर स्वप्नांची वटवाघुळे
त्या स्वप्नाचे शिल्पकार
कवी थोडे कवडे फार
पड्यावरच्या भूतचेष्टा
शिळा शोक बुळा बोध
नऊ धागे एक रंग
व्याभिचाराचे सारे ढंग
पुन्हा पुन्हा तेच भोग
आसक्तिचा तोच रोग

तेच मंदिर तीच मूर्ती
तीच फुले तीच स्फूर्ती
तेच ओठ तेच डोळे
तेच मुरके तेच चाळे
तोच पलंग तीच नारी
सतार नव्हे एकतारी

करीन म्हटले आत्महत्या
रोमिओची आत्महत्या
दधीचीची आत्महत्या
आत्महत्याही तीच ती
आत्माही तोच तो
हत्याही तीच ती
कारण जीवनही तेच ते
आणि मरणही तेच ते



## ....लागेल जन्मावे पुन्हा....

माझी न घाई काहीही,जाणून आहे अंतरी
लागेल जन्मावे पुन्हा नेण्या तुला माझ्या घरी

तू झुंजूमुंजू हासशी,जाईजुईचे लाजशी
मी वेंधळा मग सांडतो थोडा चहा बाहीवरी

तू बोलते साधेसुधे सुचवून जाशी केवढे
मी बोलतो वाचाळसा अन पंडिती काहीतरी

होशी फुलासह फुल तू अन चांदण्यासह चांदणे
ते पाहणे,इतकेच मी बघ मानले माझ्या करी

म्हणतेस तू,मज आवडे रांगडा सीधेपणा
विश्वास मी ठेवू कसा या हुन्नरी शब्दांवरी

लिहीती बटा भालावरी उर्दू लिपीतील अक्षरे
हा जन्म माझा संपला ती वाचतांना शायरी



## ....आटपाट नगरामध्ये....

आटपाट नगरामध्ये
नाही होत चोरी
हुशार मुले काळी आणि
खुळी मुले गोरी

आटपाट नगरामध्ये
कित्ती कित्ती मज्जा
प्रधान भरतो पाणी आणि
रस्ते झाडतो राजा

आटपाट नगरामध्ये
नाही चालत नाणी
एक शेर गुळासाठी
दहा बारा गाणी

आटपाट नगरामध्ये
सुट्टी नाही,बाळा
सांग कशी सुट्टी असेल ?
जर नाही शाळा..



# ....व्यवहार....

तो मुंबईहून बोभाट्यासारखा सुसाट निघाला
जपानला गेला
नंतर थायलंडला ,नंतर हाँगकाँगला कापडाच्या व्यापारासाठी
चिनी शिकला
पेकिंगला वेदांतावर प्रवचने दिलीत
पार्टीत गुरफटला
नंतर कोरिया,नंतर मॉस्को
निसटला
ऑस्लोला पेपर वाचला..
‘फिलॉसॉफिकल इंप्लिकेशन्स ऑफ क्वांटम थिअरी’
बर्लिन पडले त्यावेळी तिथेच होता
घरमालकाच्या पोरीचे पोट वाढवले
तिचे नाव आता विसरला
घसरला जर्नलिझममध्ये
मग
कॅनडा,चिली,स्पेन,मेक्सिको
विमान अपघातातून दोनदा बचावला
‘डायरी ऑफ ए डंगहिल’ हे बेस्ट सेलर त्यानेच लिहले
विलिअम बॉक्स या टोपणनावाखाली
हे सगळे त्याच्याकडूनच मला समजले
भाऊबंदांविरुध्द
धडेवाटपाचा दावा जिंकून
तो
हर्णेजवळ मुर्डीला स्थायिक झाल्यावर



## ....एकटा....

बायको घरात नाही अशी संधी साधून

मी रचला
खोलीच्या मध्यावर माझ्या संसाराचा अनाद्यंत ढीग

आणि बसलो
एका आरामखुर्चीत ढिगाकडे पहात
आगपेटीच्या काडीप्रमाणे

पण दचकलो,

ढिगाच्या शिगेवरील
एकलकोंड्या झुरळाला पाहून

पुन्हा सामान ठेवले जागच्या जागी
कोणच्याही क्षणी ती येईल

किंवा तोही



## ....सर्वस्व तुजला वाहूनी....

सर्वस्व तुजला वाहूनी , माझ्या घरी मी पाहुणी
सांगू कसे सारे तुला ,सांगू कसे रे याहूनी

घरदार येते खावया , नसते स्मृतींना का दया ?
अंधार होतो बोलका,वेड्यापिशा स्वप्नांतूनी

माझ्या सभोती घालते , माझ्या जगाची भिंत मी
ठरते परी ती काच रे , दिसतोस मजला त्यातूनी

संसार मी करिते मुका , दाबून माझा हुंदका
दररोज मी जाते सती , आज्ञा तुझी ती मानूनी

वहिवाटलेली वाट ती , मी काटते दररोज रे
अन प्राक्तनावर रेलते,छाती तुझी ती मानूनी



## ....फकिरी गाणे....

एक दिवस वज्राला मिळतो
        एक दिवस पण मिळे फुलांना;
एक दिवस शहाण्यांचा येतो
        एक दिवस पण असे खुळ्यांना.

एक दिवस विजयाचा असतो
        एक दिवस असतो शरणाचा;
एक दिवस जगण्याचा असतो
        एक दिवस असतो मरणाचा.

एक दिवस असतो याचा अन
        एक दिवस असतो त्याचाही
तुझीच असता रात्र सखे , पण
        या दिवसाची कुणास घाई ...



## ....साठीचा गझल....

सारें तिचेच होते , सारें तिच्याचसाठी
हे चंद्र, सूर्य , तारे होते तिच्याच पाठी।

आम्हीही त्यात होतों - खोटें कशास बोला
त्याचीच ही कपाळी बारीक एक आठीं !

उगवायची उषा ती अमुची तिच्याच नेत्रीं.
अन मावळावयाची संध्या तिच्याच ओठीं.

दडवीत वृद्ध होते काठी तिला बघून,
नेसायचे मुमुक्षू इस्त्री करून छाटी .

जेव्हा प्रदक्षिणा ती घालीच मारुतीला
तेव्हा पहायची हो मूर्ती वळून पाठी !

प्रत्यक्ष भेटली का ? नव्हती तशी जरूरी
स्वप्नात होत होत्या तसल्या अनेक भेटी

हसतोस काय बाबा, तू बाविशीत बुढ्ढा
त्यांना विचार ज्यांची उद्या असेल साठी



## ....घव मी तुजो शेतकरी....

दणदणता सर,फिरता नांगर
चिकल झाला हा पुरी
लाव गो लावणी पोरी

मी नाय येवचय,लावणी लावचय
चिकलात काटे भारी

चिकल तो लोण्यासारी

माका नाय व्हवचां,चिकलात जावचां
माजी चोळी भरजरी

चिकुल माजी सोनेरी !

मी पोर कवळी,वारो हा जौळी
थरथरी ही माज्या उरी

ईरली घराच्या सारी

आये माजी पाटलीण,बाप माजो पाटील
पाटलाची पोर मी न्यारी

घव मी तुजो शेतकरी



( विंदांची ही एक मालवणी कविता )

## ....महाद्वार....

संगमरवरी स्तंभावरती
        महाद्वार बांधियले कोणी
रामापासून राम्यापावत
        यातुन आले सगळे प्राणी

राम जाहला रघुकुलभूषण;
        रामा बसला लावित शेणा;
हे जगदंबे ! दोघांसाठी
        तुवां भोगिल्या समान वेणा.

तुवां भोगिल्या समान वेणा;
        त्याच ठिकाणी तीर्थाचे बल
काशी बुडवुन आल्या नंतर
        पूजित राहिन हे जन्मस्थल



## ....देणाऱ्याने देत जावे....

देणाऱ्याने देत जावे , घेणाऱ्याने घेत जावे

हिरव्या पिवळया माळावरुन हिरवीपिवळी शाल घ्यावी
सह्याद्रीच्या कड्याकडून छातीसाठी ढाल घ्यावी

वेड्यापिशा ढगाकडून वेडेपिसे आकार घ्यावे
रक्तामधल्या प्रश्नांसाठी पृथ्वीकडून होकार घ्यावे

उसळलेल्या दर्याकडून पिसाळलेली आयाळ घ्यावी
भरलेल्याशा भीमेकडून तुकोबाची माळ घ्यावी

देणाऱ्याने देत जावे घेणाऱ्याने घेत जावे
घेता घेता एक दिवस देणाऱ्याचे हात घ्यावे

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.'
हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा.
आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

नेटाक्षरी



हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com